**जिल्हा परिषदांच्या कार्यक्रम अंदाजपत्रकाच्या कामासाठी निर्माण केलेल्या अस्थायी पदांना दिनांक १ मार्च,२०१५ ते २९ फेब्रुवारी, २०१६ पर्यंत पुढे सुरु ठेवण्यास मंजूरी देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः झेडपीए-२०१५/प्र.क्र.१/वित्त-९,**
बांधकाम भवन, २५,मर्झबान पथ, फोर्ट,मुंबई-४०० ००१.
तारीख: ९ फेब्रुवारी, २०१५

**वाचा :-**

1) **शासन निर्णय ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र.काअप २००८/प्र.क्र.३८५/वित्त-९, दिनांक: ७ एप्रिल, २००८**
2) **शासन निर्णय ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र.झेडपीए-२०१४/प्र.क्र.७२/वित्त-९, दिनांक १४ फेब्रुवारी, २०१४.**

**शासन निर्णय:-**

जिल्हा परिषदांच्या कार्यक्रम अंदाजपत्रकाच्या कामासाठी निर्माण करण्यात आलेल्या ५६ अस्थायी पदांपैकी ४५ अस्थायी पदांना उपरोक्त संदर्भाधीन क्र.१ येथील शासन निर्णयान्वये स्थायी करण्यास मान्यता देण्यात आलेली आहे. उर्वरीत ११ अस्थायी पदांना दिनांक १ मार्च २०१४ ते २८ फेब्रुवारी २०१५ या कालावधीकरीता संदर्भ क्रमांक:२ येथील शासन निर्णयान्वये मुदतवाढ देण्यांत आलेली होती. सदरहू कालावधी संपुष्टात आल्यामुळे आता या आदेशान्वये खालील विवरणपत्रात दर्शविण्यात आलेल्या ११ अस्थायी पदांना दिनांक १ मार्च, २०१५ ते २९ फेब्रुवारी, २०१६ पर्यंत मुदतवाढ देण्यास शासन मंजूरी देत आहे.

| अ.क्र. | जिल्हा परिषदेचे नांव | ज्या पदांना मुदतवाढ देण्यात आलेली आहे ती पदे ( स्तंभ क्रमांक ३ +४=५ ) | | |
|---|---|---|---|---|
| | | वरिष्ठ सहाय्यक | कनिष्ठ सहाय्यक | एकूण |
| (१) | (२) | (३) | (४) | (५) |
| १ | ठाणे | १ | - | १ |
| २ | धुळे | १ | - | १ |
| ३ | सातारा | - | १ | १ |
| ४ | कोल्हापूर | - | १ | १ |
| ५ | जालना | १ | १ | २ |
| ६ | हिंगोली | - | १ | १ |
| ७ | बुलडाणा | १ | १ | २ |
| ८ | नागपूर | - | १ | १ |
| ९ | चंद्रपूर | - | १ | १ |
| | **एकूण** | **४** | **७** | **११** |
| **एकूण(स्तंभ क्र.३+४)=११ पदे** | | | | |

या प्रयोजनासाठी होणारा खर्च प्रधानशीर्ष "२०५३-जिल्हा प्रशासन-(०९३) जिल्हा आस्थापना (५) स्थानिक क्षेत्रातील योजना (०५)(०२) जिल्हा परिषद कार्यक्रम अंदाजपत्रके (२०५३०७५२) (राज्यक्षेत्र)(योजनेतर)(मागणी क्र.एल-२)" या लेखाशिर्षाखाली सन २०१५-२०१६ या आर्थिक वर्षासाठी मंजूर झालेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

हा शासन निर्णय वित्त विभागाच्या मान्यतेने त्यांच्या अनौपचारिक सं.क्र.११७/व्यय-१५, दिनांक १७ मार्च, २००५ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे. मुदतवाढ देण्यात येणा-या पदांशी संबंधित जिल्हा परिषदांनी पुढील मुदतवाढीचा प्रस्ताव विहीत नमुन्यांत मुदत संपण्याच्या १ महिना अगोदर न चुकता शासनास पाठवावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२०९१४४३४१७५२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vaibhav R Rajeghatge

Digitally signed by Vaibhav R Rajeghatge
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vaibhav R Rajeghatge
Date: 2015.02.09 15:58:54 +05'30'

**(वैभव राजेघाटगे)**
उपसचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखाकार (स्थानिक संस्था) महाराष्ट्र-१/महाराष्ट्र-२, मुंबई /नागपूर
२. महालेखाकार ( स्थानिक संस्था )
३. सर्व विभागीय आयुक्त ( महसूल)
४. संचालक तथा मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई
५. सर्व सहमुख्य लेखा परिक्षक,स्थानिक निधी लेखा (कोकण/रत्नागिरी/पुणे/नागपूर/औरंगाबाद/अमरावती)
६. सर्व सहसचिव / उपसचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
७. सर्व जिल्हा परिषदाचे मुख्य कार्यकारी अधिकारी
८. सर्व जिल्हा परिषदाचे अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी
९. सर्व जिल्हा परिषदाचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी
१०.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
११.वित्त विभाग ( व्यय-१५ / अर्थ-१७/ वित्त आयोग कक्ष )
१२.ग्राम विकास व जलसंधारण विभाग,का.क्र. आस्था ४, ६, ८,
१३.मा.प्रधान सचिव (ग्रा.वि.व पं.रा.) यांचे स्वीय सहाय्यक
१४.निवडनस्ती (वित्त-९)